# ‘अमेरिकेची वारी’

---

**४ मे २०११ . बुधवार**

प्रत्येकी नऊ तासांचे दोन मोठे विमान प्रवास करून थकलेल्या शरीरानं मी व प्रेरणा सिॲटलला भर दुपारी बारा वाजता पोहोचलो . विमान उतरत असतानाच कडक उन दिसत होतं . वाटेत पॅरिसला दोन तास थांबलो होतो . तिथं पण इथल्यासारखंच कडक उन पडलं होतं . विमानतळावरच्या प्रतीक्षालयात मस्तपैकी उन्हं अंगावर घेऊनच बसलो होतो . प्रेरणाचा पहिलाच परदेश प्रवास व तो पण अगदी शिणवणारा . इमिग्रेशन आटोपून व बॅगा ताब्यात घेऊन बाहेर आलो तो विनीत व प्रेरणा घ्यायला आलेले दिसले . जवळजवळ वर्षभरानं ऋचा तर दीड वर्षानं विनीत भेटत होते .



बाळपणी अंधाराला भिणारी व काहीशी बुजरी व मागंच राहणारी ऋचा धीटपणे व आत्मविश्वासानं गाडी चालवताना व सहजपणे वावरताना पाहून आम्हा दोघांनाही खूप बरं वाटलं . विमानात माझं खूपच खाणं झालं असल्यानं भूक अशी नव्हतीच . आंघोळ वगैरे होईतो विक्रमचा फोन येऊन गेला . थोडा आराम झाल्यावर संध्याकाळी जवळच्या एका तलावाच्या काठी एक चक्कर मारून आलो . खूप मेल येऊन पडल्या होत्या . त्यांना उत्तरं लिहिली . आता दोन महिने इथं रहायचं आहे .

**५ मे २०११ . गुरूवार**

मुंबईप्रमाणेच इथंपण सहाच्या अगोदरच जाग आली . प्रेरणा तर माझ्यापण अगोदर उठून व्यायाम करायला लागली होती . नऊच्या सुमारास गाडीतून विनीतला ऑफिसात सोडून घरी परतलो . सर्व आवरून जेवून दुपारी पुन्हा झोप काढली . जेट लॅग जायला दोन तीन दिवस लागणारच . बाहेर ढगाळ वातावरण व पाऊसपण पडत होता .



हयांचं घर टेकडीच्या वरच वसलेलं असल्यानं पटकन चक्कर मारून यावं अशी सोय नाही . पण हळूहळू लवकरच सवय होईल . सायंकाळी जवळच्याच एका बागेत फिरून व तिथल्या सुपरमार्केटमध्ये फिरून आलो .

**६ मे २०११ . शुक्रवार**

सकाळचा माफक व्यायाम झाल्यावरती तासभर मेल चेक करून चॅटिंग करणे व म . टा . लोकसत्ता वाचणे हा रोजचाच कार्यक्रम झालाय . इथल्या गार हवेला व बोच-या वा-याला, घराबाहेर पडताना ओव्हरकोट व गरम कपडे घालून मोटारीतून प्रवास करण्याला आता दोघेही जुळवून घेत आहोत . ब्रिटिश लायब्ररीच्या लिंडाची मेल आली आहे . यंग इंडियाच्या बाबत बरेच प्रश्ण तिनं विचारले आहेत . त्या प्रोजेक्टची एक कॉपी येताना घेऊन आलो असल्यानं सवड मिळेल तसं ते काम पण पूर्ण करायचा विचार आहे . सकाळी आरामच केला . प्रेरणा व ऋचा विनीतला सोडून काही खरेदी करून आल्या . विक्रमनं दिलेला फोन आता ॲक्टिव्हेट झाला असल्यानं माझ्या मित्रमंडळींना मेलवरून पाठवून दिलाय . सायंकाळी विनीतला घ्यायला गेलो . मायक्रोसॉफ्टच्या सुंदर परिसरात फेरफटका मारून आलो . विनीतचं ऑफिस बघितलं . झकासच आहे . अगदी टी . आय . एफ . आर . सारखंच सौंदर्यपूर्ण वातावरण व कामाचं स्वातंत्र्य आहे . येताना सुपरमार्केट मध्ये काही खरेदी करून आलो .







**७ मे २०११ . शनिवार**

काल पाठवलेल्या मेलचा संदर्भ देऊन प्रो . रमेश गंगोली हयांचा फोन आला . सकाळी ११ वाजता त्यांच्या घरी शौनक अभिषेकीशी गप्पांचा कार्यक्रम ठेवला होता . तिथं मला बोलावलं होतं . इथला आठवडयाचा बाजार (फार्मर्स फेअर) पाहून दुपारी विनीतनं मोटरसायकल घ्यायचं ठरवलं होतं . पण त्यात थोडा बदल करून मला त्यांच्या घरी सोडायचं ठरलं . अतिशय सुंदर जागी व तळयाकाठी हयांचं घर आहे . मला सोडून तिघंही गेले ते २ . ३० वाजता घ्यायला आले . शौनकशी गप्पा सुरू होऊन तासभर होऊन गेला होता . गंगोलींच्या तळघरात छान चर्चा रंगली होती . काही तरूण मंडळींचं गाणं झालं . छानच झालं . स्वतः रमेशजीपण गात होते . शौनकनं मला ओळख दिली . पुण्यातल्या ‘बाजा-गाजा’ मध्ये माझ्या कार्यक्रमाला तो आला होता . मी पण ‘कटयार’ व ‘लेकुरे उदंड झाली’ च्या संगीताविषयी व ध्वनिमुद्रणांविषयी प्रश्ण विचारले . ‘कटयार’ च्या वेळी चाली राम मराठे काम करणार म्हणून केल्या होत्या . पण प्रकृतीच्या कारणास्तव त्यांच्या ऐवजी वसंतराव देशपांडे काम करणार असं समजल्यावर अभिषेकी बुवांनी नव्यानं चाली बांधल्या अशी नवीनच माहिती मिळाली . इथंच एक बंगाली तरूण भेटला . त्याला मी पूर्वी अमीर खान हयांच्या गाण्यांची सी . डी . पाठवली होती . त्यावेळी तो आय . आय . टी . खरगपूर मध्ये शिकत होता . आता तो इथल्या वॉशिंग्टन विद्यापीठात पी . एच . डी . करतो आहे . सगळी मंडळी पांगल्यावरती मग मी स्वस्थपणे रमेश व शांता गंगोलींशी बोलत बसलो . अगदी स्वच्छ व मुंबै पुण्याकडच्या मराठी उच्चारांसह दोघंही बोलत होते . १९६४ च्या सुमारास ते टी . आय . एफ . आर . मध्ये मॅथेमॅटिक्स विभागात काही महिने होते . त्यांना नोकरीची ऑफर पण दिली होती . पण ते इकडे विद्यापीठात आले . मोठी असामी आहे . त्यांना ‘पूर्वसुरींचे सूर’ पुस्तकाची भेट प्रत दिली . २ . ३० च्या सुमारास मला घ्यायला ऋचा आल्यावरती मग सगळे एकत्र जेवलो .

 Prof.Ramesh Gangolli

शांताबाई कर्णबधिरांच्या शाळेत शिकवत. त्यातून रोहिणीताई, वसंत लिमये, आशाताई थत्ते व विकास विद्यालय अश्या ओळखी व गप्पा निघाल्या. त्यामुळे प्रेरणा पण त्यात सामील झाली. चार वाजता घरी आलो व दोघांनी ताणून दिली. विनीत व ऋचा मात्र बाजारात जाऊन होंडा मोटरसायकल घेऊन आले. विनीतची खूप दिवसांची इच्छा पूर्ण झाली. त्याच नादात मग त्याची सगळी संध्याकाळ व बरीचशी रात्र गेली. आई वडील व भावाशीपण बोलला. विक्रमचा पण फोन झाला. ॲमॅझॉनच्या मुलाखतींच्या पहिल्या फेरीत तो पास झाला. पुढची फेरी तो इकडे आला की होईल म्हणाला. एकूणात त्याचं बरं चाललं आहे.

**८ मे २०११. रविवार**

आज सुटी असल्यानं आरामात उठून व आवरून १0 च्या सुमारास चौघे निघालो. दोनेक तास मोटरने प्रवास केल्यावरती एका पेट्रिफाईड फॉरेस्टपाशी (Ginkgo Petrified Forest State Park) आलो. वाटेत बर्फाच्छादित पर्वत व रस्त्याच्या बाजूला पण बर्फ पहावयास मिळाला. हवा सुखद होती. अधून मधून उन पण पडत होतं. जंगल म्हणून आलो होतो खरे पण इथे थोडी झुडुपं सोडली तर जंगलाचा मागमूसही नव्हता. एक चांगलीच रूंद नदी व दोन्ही तीरांवर अगदी उघडे बोडके डोंगर होते. लाकडांचे ओंडके उच्च तपमानाला अश्मीभूत झालेले पहावयास मिळतात. हा काही मैलांचा परिसर सोडला तर इतर सगळीकडे हिरवाई जंगल व बर्फ पण आहे.






इथं लाखो वर्षापूर्वी ज्वालामुखीचा उद्रेक झाला होता व सगळा परिसर नष्ट झाला होता. त्या काळच्या जंगलसंपत्तीच्या अश्मीभूत अवशेषांचं हे जंगल. १९३१ पासून इथं संशोधनाला सुरूवात झाली. इथला इतिहास एका छोटया प्रदर्शनात मांडलेला आहे. मोटारीतून खूप दूरवर फिरून व काही स्थळं बघून आलो.

**९ मे २०११. सोमवार**

सकाळच्या चॅटरूममध्ये पुण्याच्या डॉ. सौ. शुभदा कुलकर्णी होत्या. त्यांचेबरोबर भावगीतांच्यावर काम सुरू करावयाचे आहे. डॉ. प्र. न. जोशींची ही धाकटी मुलगी. गप्पांच्या ओघात त्यांनी लहानपणीची ओळख विचारली. दातार वाडयात माई दामले हया आजीकडे सुटीत येत असत. लहानपणातल्या दातार वाडयातल्या पुष्कळ आठवणी निघाल्या व थोडा स्मरणकातर (नोस्टालजिक) झालो. संध्याकाळी विनीत जरा लवकर आला. त्याच्याकडं एनर्जी व अखंड उत्साह आहे. मग गाडीनं जवळच्या एका धबधब्याला (Snoqualmie Falls) भेट द्यायला गेलो. निघताना बाहेर थोडसं

ढगाळ व कुंद वातावरणच होतं . पंचवीसेक मैलांवरती छोटयाशा उपनगरात हे ठिकाण आहे . वेगानं कोसळणा-या पाण्याचा वापर करून इथं वीज तयार करून सिॲटलच्या काही भागाला पुरविली जाते . इथं हवा छान होती . छान पहायला मिळालं .



Snoqualmie Falls

आज ऋचाचा सत्तावीसावा वाढदिवस झाला . रताळयाचा कीस केला होता . आईनं मुंबईतून तळून आणलेले गुलाबजाम पाकात टाकले . विनीतने छान केक आणले होते . रात्री व दिवसभरात खूप लोकांचे अभिनंदनाचे फोन व मेल आल्या .

**१० मे २०११ . मंगळवार**

सकाळी नेहमी प्रमाणे मेलवर व फेसबुकवरच बराच वेळ गेला . तो पार जेवायची वेळ होईतो . फेसबुकवर इआन नागोस्की, अहमद दिलावर, विक्रम चांदवणकर व विक्रम संपत भेटले . तसेच जुना मित्र साकिब रझाक पण भेटला . परत गेलो की त्याला रेकॉर्डस पाठवून द्यायच्या आहेत . तो आता दुबईला राहतो आहे . जेवून दुपारी थोडी ताणून दिली .



**पायोनियर स्क्वेअर परिसरातली 'अंडरग्राऊंड टूर'**

मग तिघेही डाऊन टाऊन मध्ये जाऊन व पायोनियर स्क्वेअर पासची 'अंडरग्राऊंड टूर' ही गायडेड सफर करून आलो . तिथंच 'सिॲथ' हया पुरूषाचा अर्धपुतळा बघितला . त्याच्या नावानंच हे शहर वसलेलं आहे . १८५१ पासूनचा हया शहराचा इतिहास नेटवर वाचावयाला मिळतो . खाडीचं पाणी व आगीपासून नुकसान झालेल्या शहराचा इतिहास फार छान जपून ठेवला आहे . चार इमारतींच्या तळघरांतून फेरफटका मारताना शंभर वर्षे मागे जाऊन येता येतं . गेली ४५ वर्षे हा उपक्रम चालू आहे . रात्री इडली सांबार व उत्तप्याचा मस्त बेत होता . जेवून गप्पा मारत बसलो .

**११ मे २०११ . बुधवार**

आज बाहेर फारच ढगाळ वातावरण असल्यानं फारच उदास वाटत होतं . उशीराच नाष्टा झाल्यानं जेवणाला रजा दिली . ऋचा व प्रेरणा जिम मध्ये जाऊन आल्यावर त्यांचं आवरून जेवणं वगैरे होईतो मी मस्तपैकी एक झोप काढली . मग तीन वाजता डाऊनटाऊन मध्ये पॅसिफिक सायन्स सेंटर पाहून आलो . अगदी छोटया मुलांना रूचेल व आवडेल अश्या पद्धतीनं सगळं छान मांडलंय . मला मात्र बघताना कंटाळा आला .






शेवटची फुलपाखरांची बाग मात्र झकास होती . शेकडो रंगीबेरंगी फुलपाखरं बंद काचेच्या घरात मोकळेपणी फिरत व बागडत होती . बाहेर पाऊस पडत होता . बोईंग व मायक्रोसॉफ्ट सारख्या बडया कंपन्यांनी इथं करोडो डॉलर्स खर्च करून फार विचारपूर्वक सामाजिक गुंतवणूक करून ठेवलेली आहे . शेजारीच स्पेस नीडल ही हवेत उंच गेलेली सुई आहे . तिच्या पोटातल्या पाळण्यातून एकदा पार वरपर्यंत जाऊन शहराचं दर्शन घेऊन यायचं आहे . त्यासाठी हवा स्वच्छ व मोकळी हवी . आज मात्र ढगाळ वातावरण व पाऊस होता . बोचरं वारंपण सुटलेलं होतं . त्यात ट्रॅफिक जाम मध्ये पाऊण तास अडकून पडलो . त्यामुळं सात वाजता घरी पोहोचलो . विनीत आला होता . पावसात चिंब भिजूनच आला होता . गरमागरम आलू पराठयाचा बेत होता .

**१२ मे २०११ . गुरूवार**

आज सकाळपासूनच आभाळ स्वच्छ व बहुतांशी निरभ्र दिसत होतं . इकडे रात्री दहा ते पहाटे चार इतकाच अंधार असतो . त्यामुळं उठल्यावर भगभगीत प्रकाशच दिसतो . चांगलंच उजाडल्यावर छान उन पडलं होतं . त्यामुळं मग ऋचानं इथल्या प्रसिद्ध बोटॅनिकल गार्डन मध्ये घेऊन जायचं ठरवलं . 'वॉशिंग्टन पार्क अर्बोरिटम' इथं चार तास कडक उन्हात भटकलो . शेकडो प्रकारची फुलझाडं व वनस्पती २३० एकरात निसर्गप्रेमींसाठी व अभ्यासकांसाठी सत्तरेक वर्षांपासून फार निगुतीनं राखून ठेवलेली आहेत . कितीतरी दुर्मिळ जाती इथं नीटपणे राखून ठेवल्या आहेत .





washington park arboretum

जापनीज गार्डन तर खास वैशिष्टयपूर्ण व आवर्जून पहावी अशीच आहे . हया सर्वांचा इतिहास इंटरनेटवर सहजच उपलब्ध असल्यानं एखादं ठिकाण पहायला जाण्यापूर्वी व पाहून आल्यावरती खूप माहिती घरी बसल्या मिळवता येतो . ग्लोबल पोझिशनिंग सिस्टम (जी . पी . एस . )मुळं निघण्यापूर्वीच दिवसभराचं हवामान, ट्रॅफिक जाम होण्याची शक्यता असलेल्या जागा व वेळा व नकाशांवरची माहिती यामुळं दिवसभराचा कार्यक्रम आखून तो नेटकेपणानं पार पाडायला खूप मदत होते . मोटारीत तर हया प्रणालीचा फार उपयोग होतो . विशेषतः अगदी अपरिचित जागी जाताना

तर फारच. रमेश गंगोलींच्या घरी जाताना ऋचानं फक्त त्यांचा पत्ता दिला होता. त्यावरून मोटारीत लावलेल्या छोटया स्क्रीनवर नकाशे दिसू लागले. तोंडी सूचना ऐकू येत होत्या. त्यांच्या घरासमोर गाडी येताच 'गंगोलींचं घर आलं हो' असा पुकारापण झाला. आमची नातवंडं व पतवंडं बहुधा ऑटोकार मध्ये बसून थ्री. डी. गॉगल वापरून सिनेमा बघतच प्रवास करतील अशी लक्षणं दिसताहेत. गाडया स्वयंचालितच असतील.

**१३ मे २०११. शुक्रवार**

आज दिवसभर आभाळ स्वच्छ राहून झकास उन पडणार हा इथल्या हवामान खात्याचा अंदाज खरा ठरला. त्यामुळे भर दुपारी बारा वाजता इथल्याच परिसरात फेरफटका मारून आलो. बाकावर बसून उन खात बसलो. डोक्यावरून दर मिनिटाला एक विमान उडत होतं. खूपच बिझी एअरपोर्ट दिसतो आहे.




सायंकाळी सिटी सेंटर मध्ये जाऊन 'डक टूर' करून आलो. दुस-या महायुद्धाच्या काळात विकसित झालेली मोटार कम मोटार लॉंच वापरून नव्वद मिनिटांची सफर आहे. त्यात शहरातल्या महत्वाच्या रस्त्यांवरून फिरवून आणतात. मग इथल्या तळयात हयाच गाडीत बसून एक फेरी मारतात. शेवटी पुन्हा रस्त्यावर आणून मोटारनं फिरवतात. इकडे चालकच गाईड असतो. मजा आली. साडे आठला जेवलो. पण दहा वाजेपर्यंत बाहेर चांगलाच प्रकाश होता.

**१४ मे २०११. शनिवार**

आज हवामानाच्या अंदाजाप्रमाणे सकाळी उन व सायंकाळी पाऊस पडणार होता. १० वाजता खरोखरीच कडक उन पडलं होतं. त्यामुळं मी व प्रेरणा गरम कपडे घेऊन व नेहमीचा जामानिमा करून बूट वगैरे घालून बाहेर पडलो. घरामागच्या टेकडीवर फिरायला गेलो. सुंदर टुमदार चित्रातल्यासारखी घरं रस्त्याच्या दोन्ही बाजूला होती. अगदी 'असावे घरटे अपुले छान' गाण्यांतल्या वर्णनाप्रमाणे. इथल्या विशिष्ट अश्या हवामानामुळे विविध प्रकारची झाडं, फुलं व वेली छान बहरलेल्या आहेत. टयुलिप जातीची फुलं तर पुष्कळ व निरनिराळया रंगांची. आल्यापासून आज प्रथमच मनसोक्त भटकून आलो. एके ठिकाणी 'गराज सेल' लागला होता. तिथे मुलांची खेळणीच मांडून ठेवलेली होती. किंमतीपण अगदीच माफक म्हणजे पाच दहा डॉलर्सच्या आसपास. छान फिरणं झाल्यानं मन प्रसन्न होऊन गेलं. थोडी भूक पण लागली. ऋचा व विनीतनं मेक्सिकन पद्धतीचं जेवण बनवलं होतं. छान होतं. मग गूगल फोनवरून बाळया ढेरे व संजीव टण्णूशी गप्पा मारल्या. त्यांना पण खूप आनंद झाला. दुपारी पण छान उन पडलं होतं. अंदाजाप्रमाणे सायंकाळी मात्र अंधारून आलं व चक्क पाऊस पडायला लागला. सात नंतर चौघे गाडीनं जवळच्या रेंटॉन हया उपनगरात एका मोठया सुपरमार्केटमध्ये जाऊन आलो. कम्प्युटरच्या विभागात कितीतरी नवीन उत्पादनं पहावयाला मिळाली. रात्री गरमागरम डाळ तांदूळाची खिचडी खाऊन बराच वेळ गप्पा मारत बसलो.



**१५ मे २०११ . रविवार**

आज दिवसभर पावसाची रिपरिप व बोचरे थंडगार वारे . त्यामुळे बाहेर कुठं पडायची सोयच नव्हती . विनीत त्याच्या कामांत तर ऋचा तब्येत नरम असल्यानं आरामात होती . आम्ही वाचन, फेसबुक व गुगल फोन मध्ये बिझी होतो . मेहेरांशी बोललो . भीमसेनजींवरचा कार्यक्रम रंगला म्हणाले . माणिक महोत्सवातला हा पहिलाच शुभारंभाचा कार्य क्रम होता . हॉल छान भरला होता . भारती, वंदना व राणी हया तिन्ही मुली हजर होत्या व बोलल्यापण . शुभदा दादरकरांनी निवेदन केलं . श्रोत्यांनापण हा फॉरमॅट आवडला . माझी ब-याच मंडळींनी चवकशी केली . ज्ञानेश पेंढारकरनंच पॉवर पॉइंट ऑपरेट केलं . पुढच्या वर्षी माणिक ताईवर असाच कार्यक्रम करायला मला बोलवायचं असं श्रीकांत दादरकर मेहेरांपाशी म्हणाले . प्रकाश बुरडेंच्या मेलवरून पण कल्पना आली . म्युझिक फोरमची मिटींग नेहमीप्रमाणेच झाली . शिवानंद पाटीलच्या शोक सभेचा मात्र योजनानं अगदी 'इव्हेंट'च करून टाकला असं बुरूडे हयांचं मत पडलं . सायंकाळी जरा पाऊस कमी झाल्यावर एकटाच परिसरात फिरून आलो .



**सिॲटलमधील हवामानाची विविध रूपं .**

विनीत व प्रेरणा सकाळी जिम मध्ये फिरून आले होते . तो तर मोटरसायकलवरून पण भटकून व कामं उरकून आला होता . साडेसातच्या सुमारास लख्ख उन पडल्यानं मी व प्रेरणा पुन्हा एकदा जामानिमा करून बाहेर पडलो ते पार मेन रोड पर्यंत जाऊन आलो . अतिशय सुंदर परिसर पण माणसांची वर्दळ शून्य हे चित्र आता सरावाचं होऊ लागलेलं आहे . रात्री बेताचं जेवून वाचत बसलो . कुरियरवाल्या अशोक कार्टेना फोन केला व ऊशीरानं झोपलो .

**१६ मे २०११ . सोमवार**

रोजच्या प्रमाणेच सहा वाजताच जाग आली . थोडासा व्यायाम करून चहा घेत डायरी लिहीत बसलो . प्रेरणाचा पण उठून दिनक्रम सुरू झालेला होताच . रविवार असल्याने ऋचा व विनीत उशीरानं उठले . तोवर आमचं आवरून नाष्टापण झालेला होता . आज बाहेर वातावरण स्वच्छ कोरडं होतं . त्यामुळं दोघांनी खूप लांबवर फिरून यायचं ठरवलं . नऊच्या सुमारास निघालो ते साडेदहा वाजता परतलो . ती हायवेपर्यंत जाऊन आली . तर मी पार्कमध्ये थोडा फिरलो . श्री . के . क्षीरसागरांचं आत्मचरित्र वाचायला घेतलं . गेल्याच आठवडयात माधव ज्यूलियन हयांच्या 'संगमोत्सुक डोह' हया कवितेवर थोडं काम केलं होतं . त्यांच्या चरित्राची बरीचशी माहिती इथं वाचावयास मिळते आहे . १९३० ते ६० पर्यंतचे पुणे शहर, उच्च शिक्षण क्षेत्रातल्या खटपटी व लटपटी, श्री . के . क्षीं . चं टीका विषयवरचं मूलभूत काम हयाच्या विषयी छान वाचायला मिळतं आहे . इतकं की मूळ पुस्तकं मिळवून वाचावयाची प्रबळ इच्छा होते आहे .




सायंकाळी चौघे गाडीनं जवळच्या उपनगरात गेलो.'मयूरी' हया दुकानात भारतीय ब्रांडचा दाणापाणी विकायला ठेवलेला बघितला.हळदीराम, पारले व ब्रिटानियाची उत्पादनं मुबलक प्रमाणावर आहेत.अगदी साईबाबांपासून ते बाबासाहेब आंबेडकरांपर्यंत तसबिरी पण बघितल्या.तिथं फुकट वाचावयाला ठेवलेल्या स्थानिक वर्तमानपत्रांतून इथं येणारा भक्तिचा पूर व त्याच्या जाहिराती पण पाहिल्या.दक्षिणेकडच्या माँ अमृतानंदमयी भक्तांना मिठी मारण्याकरिता हया महिन्याच्या शेवटाला यायच्या आहेत.सत्य साईबाबांवर पण फोटोफीचर पहिल्याच पानावर आहे.मग शेजारच्या पोस्ट ऑफिसात विनीत बरोबर गेलो.न्यू जर्सीच्या प्रमोद वर्टींना सी.डी.चं पाकिट पाठवलं.आधुनिक पोस्ट ऑफिस पहायला मिळालं.न्यू जर्सीच्या जयंत कुलकर्णींच्या मुळं त्यांचा परिचय झाला.मुंबईचेच असून ६८ वर्षांचे आहेत.ऑडियो फाईल्स स्वच्छ करण्यात हातखंडा आहे.त्यामुळं त्यांच्या बरोबर मेल वरती काम चालू आहे.मग याच परिसरातल्या एका सार्वजनिक वाचनालयात गेलो.दोघांनी पुस्तकं बदलून घेतली.घरी आल्यावर गरमागरम वरण भात जेवलो.थोडा वेळ वाचत बसलो.का कुणास ठाऊक पण गेले काही दिवस १0च्या आतच डोळयांवर झापड येऊ लागली आहे.बाहेर गप्पा चालू असताना मला मात्र गाढ झोप लागते आहे.बाहेरचा गार वारा अंगावर घेतल्यानं पण असू शकेल कदाचित.

**१७ मे २0११.मंगळवार**

रात्री लवकर झोपल्यानं पहाटे पाच वाजताच जाग आली.प्रेरणा पण झोपलेलीच होती.बाहेर छान उजाडत होतं.हा आठवडाभर छान उन पडणार असं भाकित आहे.त्याप्रमाणे खरोखरीच अगदी रात्री साडेआठ पर्यंत लख्ख उन पडलं होतं.तरीपण बाहेरचं तपमान सुसहय होईतो अकरा वाजले.मी व प्रेरणा बाहेर पडलो व स्वतंत्रपणे दोन दिशांना बरेच चालून आलो.श्री.के.क्षीरसागरांचं चरित्र हातातून ठेववत नाही इतकं छान झालंय.इथल्या बागेत फिरून एका बाकावर उन्हात बसून वाचत बसलो.दुपारी पण बाहेर गेलो तेव्हां जाता येता वाचतच होतो.







इथल्या प्रसिद्ध 'बालार्ड लॉक्स' परिसरात दुपारी आम्ही तिघं गेलो.इथल्या गोडया पाण्याची तळी जिथं खाडीच्या खाऱ्या पाण्याला मिळतात त्या जागी १९११ साली Hiram M. Chittenden हया इंजिनियरनं अभिनव कल्पना लढवून प्रत्यक्षात आणली.छोटया मोठया शिडाच्या मोटर बोटी पाण्याची पातळी वाढवून व कमी करून तळयातून

खाडीत व उलट नेता व आणता येतात. त्याचं प्रात्यक्षिकही अनेकदा पहायला मिळालं. शिवाय तळयातल्या माश्यांचं संवर्धन पण छान केलेलं आहे. भोवताली सुंदर बाग केली आहे. दूरवर एक रेलवे वाहतूक करणारा अजस्त्र पूल आहे. त्याची ऊघडमीट पण प्रेक्षणीय होती.



तिथून जवळच एका पार्कमध्ये गेलो. समुद्रकिनाराच होता. उन असल्यानं बरीच मंडळी आली होती. गोव्याच्या किंवा अंदमानच्या सागरकिना-यांची आठवण येत होती. साडेसात वाजता परतलो. विनीत आला होता. खरंतर दमलो होतो. पण मग जवळच्या एका मंगोलियन उपहारगृहात जाऊन छानपैकी गरमागरम भाजी भात खाऊन आलो. पाव भाजीसारखा प्रकार होता. आपणच निवडून घेतलेल्या भाज्या व नूडल्स मोठया तव्यावर परतून देतात. ते छान लागत होतं. पोटभर खाऊन व उरलेलं बांधून घेऊन ऊशीरा परतलो. वाचत बसलो. उशीरानं झोपलो. पुढचे दोन तीन दिवस असंच स्वच्छ उन पडणार असल्यानं उद्या इथल्या वोईंग हया विमान कंपनीनं मांडलेलं प्रदर्शन बघायला जायचा बेत आहे. रात्री विक्रम पण येणार आहे.

**१८ मे २०११. बुधवार**

आजपण स्वच्छ उजाडल्यानं खिडकीतून दूर सूर्य उदय पाहता आला. प्रेरणा एक लांबचा फेरफटका मारून परतली. दिवसभर उभंच रहायचं असल्यानं मी घरीच थांबलो. ११ वाजता तिघं निघालो. पोट जडच असल्यानं बरोबरच थोडंसं खाणं घेऊन गेलो. तासाभराच्या प्रवासानंतर वोइंग कंपनीनं मांडलेल्या 'दि म्युझियम ऑफ फ्लाईट' च्या जागेवर पोहोचलो. त्यांच्या परिसरात खाजगी विमानतळाला लागून असलेल्या इमारतीत चार मोठया दालनांत हे सुंदर व माहितीपूर्ण प्रदर्शन मांडलेलं आहे. काल बघितलेल्या बालार्ड लॉक्सच्याच सुमारास १९१५ मध्ये शहराच्या हया टोकाला विल्यम बोइंग हा महत्वाकांक्षी तरूण विमानविद्येला पुढं नेऊन स्वतःची विमानं बनविण्याची स्वप्नं पाहू लागला होता. त्याच्या सुरूवातीच्या काळाचं व एकूणच अमेरिकन विमान उद्योगच्या इतिहासाची भरगच्च माहिती असलेलं भव्य दालन खिळवून ठेवणारं व पाय दुखवून टाकणारं आहे.



**The Museum of flight exhibition [center – William Boeing (1881-1956)]**

विल्यम वोइंगचं 'रेड वार्न', तिथं सुतारकामाचं वर्कशॉप, पलंग बनविण्यापासून झालेली सुरूवात, लाकडी ते धातूच्या विमानांच्या बांधणीचे टप्पे फार माहितीपूर्ण आहेत. त्यात राईट बंधूंची तपशीलवार माहिती आहे. तशीच इथल्या परिसरातल्या 'फ्लाईट' क्लब व त्याच्या सभासद वैमानिकांची पण माहिती आहे. जागोजागी इंटरॲक्टिव्ह व्हिडीयो

पॅनल्स अगदी इंग्रजी सबटायटल्स सह असल्यानं ज्याला तपशीलात जाऊन काही माहिती घ्यायची आहे त्याची फार मोठीच सोय झाली आहे. १९३४ साली विल्यम कंपनीतून बाजूला झाले पण काम मात्र वेगानं व विविध दिशांनी वाढत होतं. त्याचा धावता आढावा वरच्या मजल्यावर पाहावयास मिळाला. आधुनिक विमानांना 'बोईंग' अशी सुरूवात करून नावं दिलेली असल्यानं (उदा. बोइंग ७0७, ७४७ वगैरे) विल्यमची स्मृती कायमची जपलेली आहे. हे दालन पाहून बाहेर आल्यावर पाय दुखायला लागले. थोडावेळ बाहेर बसूनच रहावं लागलं. मग एका मोठया टयूबच्या ओव्हरब्रिजवरून रस्त्याच्या पलिकडं गेलो. तिकडे तर मोठाली विमानं सुबकपणं मांडून ठेवलेली होती. त्यातल्या दोन विमानांमध्ये तर आतून फिरून यायची सोय होतं. कंकॉर्ड जातीचं प्रवासी विमान प्रथमच आतून बघायला मिळालं. ध्वनीच्या दुप्पट वेगानं प्रवास होई खरा, निम्मा वेळही वाचत असे. पण महागडा प्रवास, अधिक इंधन व प्रचंड आवाज हयामुळं ही विमानं प्रवासी विमानं म्हणून टिकू मात्र शकली नाहीत. त्याच्या मागेच अमेरिकेचे अध्यक्ष १९७0 पर्यंत वापरत ते विमान पहायला मिळालं. ही दोन विमानं आतून बघायला मिळणं ही मोठीच पर्वणी होती. त्यांच्या मागे नासाचं, एक कॅनेडियन व एक ७४७ उभी होती. पण बाहेरूनच फिरून बघण्यासाठी होती. ही विमानं बघून परत मुख्य इमारतीत आलो. आता थोडीशी भूक पण लागलेली होती. गरम कॉफी घेऊन धावपटटीच्या कुंपणापाशी मांडलेल्या टेबलांपाशी जाऊन बसलो. अतिशय बिझी विमानतळ. छोटी मोठी अनेक विमानं सतत उडत व उतरत होती. त्याला अगदीच लागून रेलवे लाईन होती. तिच्यावरून एखादी चिमुकली गाडीपण जाताना दिसे. दूरवर बर्फाच्छादित रेनियर पर्वत उन्हात चमकत होता. एकूण वातावरण खूप प्रसन्न होतं. कामाचा दिवस असूनही पर्यटकांची चांगलीच गर्दी होती. खाणं आटोपून दमविणा-या पण खेचून घेणा-या प्रदर्शनाच्या उरलेल्या भागाकडं वळलो. उपहारगृहाच्या बाजूला एका मोठया दुमजली इमारतीत पहिल्या व दुस-या महायुद्धांचा विमान विद्येच्या अनुषंगानं येणारा इतिहास मांडून ठेवलेला आहे. तो बघितला. इथंही त्याकाळात वापरात आलेली लढाऊ व बॉंबफेकी विमानं सुबकपणं मांडून ठेवलेली आहेत. शिवाय जागोजागी माहितीफलक व व्हिडीयो. कुणा गाईडची मदत नकोच. तरीपण बोइंग कंपनीत, नासा व इतरत्र कामं केलेले ज्येष्ठ कर्मचारी जागोजागी आढळले. सुहास्यवदनानं माहिती द्यायला आपणहून पुढं येत. काहीतर अपंग पण जिद्द नजरेत भरण्याजोगी. इतर अनेक क्षेत्रांप्रमाणेच हया दोन महायुद्धांमुळं विमान विद्या विकसित होऊन वाढीला लागायला मदतच झाली. युद्धसामग्री, टपाल व सैनिकांची वेगानं वाहतूक व शत्रूच्या प्रदेशात खोलवर जाऊन हवाई हल्ले चढवणं, बॉंब फेकणं यासाठी अनेक तंत्रं व यंत्रं विकसित झाली. दुस-या महायुद्धाच्या समाप्तीनंतर नागरी वाहतूकीकडं हळूहळू जगभरातल्या विमान कंपन्यांचं लक्ष जाऊ लागलं. आज विमान प्रवास व उद्योग किती प्रचंड वाढलाय ते कुठच्याही मोठया शहराच्या विमानतळापासच्या आकाशात नजर टाकली की पहायला मिळतं.





हे दालन बघून थोडा वेळ इथल्या सिनेमा थिएटरात डोकावून मग शेवटच्या दालनात आलो. इथं अवकाशयुगाचा साधारणपणे १९६0 नंतरचा इतिहास आहे. त्यात सोविएत रशिया व अमेरिका हयांच्यातल्या शीतकाळातल्या अवकाशस्पर्धेचं दर्शन होतं. छोटी मोठी अंतराळयानं ते स्पेस शटल व स्टेशन्स हयांचं प्रदर्शन आहे. तिथून पुढं लिफ्टनं टॉवर वर गेलो. समोरच्या विमानतळावरचं वैमानिक व कंट्रोल टॉवरवरच्या कर्मचा-यांचं संभाषण सतत ऐकू येत होतं. समोर विशाल धावपटटीवरती वाहतूक पहायला मिळत होती. हया दालनात विमानतळ, तिथला अफाट पण सूसूत्र कारभार व तो कसा चालतो हयाची माहिती डिस्प्ले व व्हिडियोपटांच्या माध्यमातून सर्वसामान्यांना समजेल अशी पहायला वाचायला व ऐकायला मिळते. खालच्या हॉलमध्ये खूप विमानं मूळ स्वरूपात मांडून व टांगून ठेवलेली आहेत. त्यात एअर कार व एअरबस हयांची वर्किंग मॉडेल्स पण पहायला मिळाली. ही कल्पना आज मागे पडली असली तरी भविष्यात पुन्हा उचल खाणार नाही असं काही नाही. इथंच छोटया व मोठयांनी पण हाताळावेत असे अनेक फ्लाईट

सिम्युलेटर्स दिसले. त्यावर बरीच मंडळी रंगून गेलेली होती. हे सगळं अवाढव्य प्रदर्शन पाहून पुन्हा येऊन अधिक तपशीलात जाऊन पहावयाची इच्छा होते. त्याच बरोबर पुढच्या पिढया हे इथं येऊन बघतील की 'गुगल' व 'यू टयूब' च्या माध्यमातून दुरूनच बघतील ही पण शंका यावी असंच वातावरण इथं व भारतात आहे. कुठचीही गोष्ट व्हर्च्युअल रिॲलिटीत उपलब्ध होते आहे. त्यात सर्वसामान्यांचा सक्रिय सहभाग असल्यानं हा जगन्नाथाचा रथ वेगानं ओढला जाणार हे निश्चित.



तासभर प्रवास करून परतलो. वाटेत दूध व वाणसामानाची खरेदी झाली. शहराबाहेर घर असल्यानं शांतता आहे हे खरं पण बारीक सारीक गोष्टींसाठी खूप दूरवर गाडी हाणत जावं लागतं. विनीत सात वाजता आला. श्री. के. क्षीं. चं पुस्तक वाचता वाचता अगदी छोटी डुलकी लागली. नऊ वाजता आम्ही तिघं विक्रमला आणायला एअरपोर्टवर गेलो. प्रेरणानं थालीपीठं व गुलाबजाम बनवले होते. जेवून गप्पा मारत बसलो. खूपच दमलो होतो. पडल्या पडल्या झोपी गेलो.

## १९ मे २०११. गुरूवार

ऊशीरा झोपलो तरी लवकरच जाग आली. आजही बाहेर छान उन होतं. आठ वाजेपर्यंत डायरी व मेल चेक करणं चालू होतं. कालचं उशीराचं जेवण अजून अंगावरच असल्यानं न्याहरी थोडी ऊशीरानंच झाली. विक्रमचा अकरा वाजता ॲमॅझॉन मध्ये नोकरीसाठी फोन इंटरव्हयू असल्यानं मी व प्रेरणा बाहेर पडलो व बागेत फिरून आलो. श्री. के. क्षीं. चं आत्मचरित्र आज वाचून पूर्ण केलं. विलक्षणच आहे. सुमारे दहा वर्षापूर्वी पुण्यात लकडी पुलावरून फिरत असताना रस्त्यावर दहा रूपयांना मिळालं होतं. वाचायचं राहूनच गेलं होतं. इथं आणताना सुद्धा वजनदार म्हणून मी बाजूलाच काढून ठेवलं होतं. पण प्रेरणानं घेतलं. इथल्या पहिल्या आठवडयात 'संगमोत्सुक डोह' हया माधव ज्युलियन हयांच्या कविता व मुद्रित गाण्याचं संकलन करीत असता हे पुस्तक चाळलं. त्यात हया कवीचा उल्लेख होताच. पण लहानपणी पुण्यात पाहिलेली अनेक स्थळं, माणसं व प्रसंगांची वर्णनं दिसू लागली. त्यामुळं कुतूहल वाढत गेलं. सवड मिळेल तसं तीनेक दिवसात वाचून काढलं. त्यामुळं परतल्यावर त्यांची पुस्तकं मिळवून वाचायची इच्छा होते आहे. जेवून जरा विश्रांती घेतली. दोन वाजता विक्रमचा दुस-या एका कंपनीचा फोन इंटरव्हयू झाला. बरे झाले म्हणाला. ॲमॅझॉन वाल्यांनी आणखी आज लगेचच एका फोन इंटरव्हयूसाठी मेलवरून निमंत्रण धाडलं आहे. तो आता पुढच्या आठवडयात होईल. प्रत्यक्ष मुलाखतीकरिता बोलावलं तर त्याला त्यांच्या खर्चानं सिॲटलला यायला मिळेल. आठ वाजता सगळे डाऊन टाऊनला जायला निघालो. बाहेर प्रखर उन होतं. सिटी सेंटरपाशी स्पेस नीडल पाहायला जायचं ठरवलं. सायन्स म्युझियम व डक टूर इथूनच घेतली असल्यानं हा परिसर आता चांगलाच परिचयाचा झाला आहे. शहराचं मध्यवर्ती केंद्र व पर्यटन स्थळ असल्यानं वर्दळ पण पुष्कळ असते. सहाशे फूट ऊंचीची ही सुई १९६२ साली सिॲटल मध्ये भरलेल्या जागतिक औद्योगिक प्रदर्शनाच्या वेळी ऊभारली असून आता ते एक प्रमुख आकर्षण बनलंय. त्यावेळी ते सर्वात ऊंच बांधकाम होतं. पण आता त्याच्या पेक्षाही ऊंचच ऊंच इमारती दिसताहेत. लिफ्टनं काही मिनिटांतच वर पोहोचलो.






सर्वदूर पसरलेल्या सिॲटल शहराचं मनोहारी दर्शन होत होतं. नुकताच सूर्यास्त झाला असल्यानं दूरवर डोंगरांच्या रांगांपलिकडे लाली पसरलेली दिसत होती. त्याच्या पुढयात शहरात घुसलेली खाडी, त्यातून फिरणा-या स्पीड बोटी व अगदी हया शहराचा मानबिंदू असा बर्फानं भरलेला शुभ्र रेनियर पर्वत लक्ष वेधून घेत होता. टॉवरवरून गोल चक्कर मारून आधुनिक काळातलं नागरी जीवन इतक्या ऊंचावरून बघितलं. दिल्लीचा कुतुबमिनार व पॅरिसच्या आयफल टॉवरचीच आठवण येत होती. बाहेर गार वारं सुटलेलं होतं. आतल्या उबदार रेस्तरांत कॉफीचे घुटके घेत बसलो. साडेनऊ वाजून गेले होते. आता सगळं शहर दिव्यांनी ऊजळून निघालं होतं. शंभरेक वर्षांपूर्वी एडिसननं लावलेल्या वीजेचा हा मनोहारी आविष्कार सुखावून व चकित करून गेला. मग जवळच्याच एका इटालियन रेस्तराँत विक्रमचा आवडता पिझ्झा व केक खाऊन एका टेकडीच्या माथ्यावरून झगमगत्या शहराचं दर्शन घेऊन बाराच्या सुमारास थकलेल्या शरीरानं पण प्रसन्न मनानं घरी आलो. एकूणात आत्तापावेतो वारी छानच चालली आहे.




**२० मे २०११. शुक्रवार**

रोजच्या प्रमाणे पहाटे लवकरच जाग आली. तरूण मंडळी सावकाश उठली. सगळं आवरून मी व प्रेरणा उद्यानात तासभर फिरून आलो. फारच छान उन पडलं होतं. पुढचे आठेक दिवस हवा फार खराब आहे असा नेटवरचा अंदाज आहे. ओशनोग्राफी व उपग्रहांवरून मिळणा-या छायाचित्रांमुळे हल्ली असे अंदाज हे टिंगलीचे विषय न राहता विसंबून रहावेत असे होऊ लागले आहेत. दुपारी थोडी विश्रांती घेऊन निघालो. विनीतला ऑफिसातनं घेऊन सगळे पुन्हा कालच्याच स्पेस नीडल पाशी आलो. विनीत व ऋचाचा वार्षिक पास होता. काल आम्हा दोघांना हे गेस्ट कूपन उद्या पण चालेल असं सांगितलं होतं. त्यामुळंच आम्ही परत आलो होतो. पण तिकीट खिडकीवरती काही वाद निर्माण झाला. पण थोडी हुज्जत घालून झाल्यावरती पासेस मिळाले. दोनेक तास वरच्या गॅलरीत फिरून आलो. कालच्यापेक्षा आज वारं फार वेगानं नव्हतं. त्यामुळं मी पण गॅलरीत दोन चकरा मारून शहर दर्शन घेऊन आलो. मग जवळच्याच 'डिस्कव्हरी पार्क' मध्ये जाऊन खाडीच्या काठी फिरून आलो. बोटींचा खूप मोठा तळ बाजूलाच दिसत होता. रात्री उशीरापर्यंत वाचत बसलो.

**२१ मे २०११. शनिवार**

आज ढगाळ वातावरणच होतं. विक्रम घरी अभ्यास करत बसला. तर आम्ही चौघंजण 'डिसेप्शन पास स्टेट पार्क' पहायला अकरा वाजता निघालो. दोनेक तास मोटर प्रवासानंतर एका खाडीवरच्या पुलापाशी पोहोचलो. सुमारे एक हजार फूट उंचीचा दोन भागातला पूल असून तलाव व खाडीचा संगम आहे व पुढं दूर समुद्रात जाऊन मिळाल्याचं

पहावयास मिळतं. पाण्याच्या पातळीपासून सुमारे दोनशे फूट ऊंचावर असून १९३५ च्या सुमारास बांधलेला आहे. त्याचा इतिहास नेटवर पण वाचायला मिळतो. त्यात काळे पाणी व अंदमानशी बरेच सारखेपणा आहे. मनुष्यवळाची तस्करी, गुन्हेगारांसाठी इथं उभारलेला तुरूंग हयाची रोमहर्षक वर्णनं वाचायला मिळतात. पाऊस नसल्यानं चांगलं फिरायला मिळालं. मी गाडीतच बसून राहिलो. तिघं खाली पार पाण्याच्या पातळीपर्यंत जाऊन फिरून आले.



Deception Pass State Park

मग दुसऱ्या एका ठिकाणाहून तिघंजण बोटीनं समुद्रात दूरवर तासाभराची फेरी मारून आले. सहा वाजता परतलो. रमेश गंगोलींनी बिलावल रागावरती चर्चा ठेवली होती. त्यासाठी ललिता रमणन हयांच्या घरी गेलो. दोनेक तास छान चर्चा व ध्वनिमुद्रणं ऐकायला मिळाली. गंगोलीच बोलत होते. अशोक रानडे सरांच्या व्याख्यानांचीच आठवण येत होती. शांताजीपण होत्या. आठ दहा जणंच होतो. पण जाणकार मंडळी होती. तबल्यावर उपाध्ये नावाचे सांगलीचे गृहस्थ होते. त्यांचा मुलगा पण आला होता व छान मराठी बोलत होता. नऊ वाजता इडली सांबाराचा आस्वाद घेऊन मंडळी परतू लागली. पुढच्या शनिवारी दुपारी गंगोलींकडे 'पूर्वसूरींचे सूर' हया विषयावर माझं प्रेझेंटेशन ठेवायचं ठरलं. विद्यापीठात पण एक ठेवूया असं रमेशजी म्हणाले. तिथं भीमसेनजींवर करू या असं मी सुचवलं. साडेनऊ वाजता विनीत मला घ्यायला आला. मि. रमणन पण मायक्रोसॉफ्ट मध्येच काम करतात. त्यांचं थोडं बोलणं झालं. साडेदहा वाजता घरी आलो. आज खूपच दमलो होतो. पटकन झोपी गेलो. उद्या संध्याकाळी मोहीत चिटणीस बायकोसह येणार आहेत. वेळ छान मजेतच चाललाय.

**२२ मे २०११. रविवार**

ढगाळ हवा असूनही थोडा वेळ छान उन पडलं होतं. त्यामुळे एकटाच बाहेर खालच्या बागेत जाऊन भटकून आलो. रविवारची कामं ऊरकून उशीरा थोडं खाऊन सगळे डाऊन टाऊनला रविवारच्या बाजारात भटकून आले. मी जरा झोप काढली. चिटणीसांची वाट पहात बसलो. पाच वाजता चिटणीस पती पत्नी आले. ते एका फर्ममध्ये अकौंटंट आहेत. बायको बँकेत कामाला आहे. भावंडं मुंबै पुण्याकडे असतात व पुण्यात ८७ वर्षे वयाची आई आहे. दोघंही बोलायला मोकळे ढाकळे. खूप गप्पा झाल्या. विनीत आल्यावर मायक्रोसॉफ्ट मधल्या चवकश्या, तिथली मराठी माणसं व त्यांचे गणपती होळी व दिवाळी सारखे त्या परिसरात साजरे होणारे सण व उपक्रम हया विषयी मोहीत भरभरून बोलले. बृहन महाराष्ट्र मंडळाच्या इथं झालेल्या अधिवेशनाच्या बैठका त्याच मायक्रोसॉफ्टच्या परिसरात होत असत. त्या अधिवेशनाचे अध्यक्ष जब्बार पटेल होते. इथल्या मराठी मंडळींची व महाराष्ट्र मंडळाची बरीच माहिती मिळाली. साधारणपणे १९८५ नंतर मायक्रोसॉफ्टमुळं इथं मराठी माणसं वाढली. आज सुमारे दोनेकशे कुटुंबं इथं राहतात. १९९३ मध्ये इथल्या मंडळाच्या कामाला सुरूवात झाली. त्या अगोदर १९६५ पासून रमेश व शांता गंगौली इथल्या भारतीयांसाठी अभिजात संगीतात खूप काही काम करू लागले होते. त्या पती पत्नीविषयी इकडे सगळीकडं खूपच आदराची भावना दिसली. त्यांच्या 'रागमाला' संस्थेची आणखी माहिती मोहीतकडून मिळाली. निरंजन बेनेगल दाम्पत्याची पण आठवण निघाली. मग २५ जूनच्या कार्यक्रमांची प्रेझेंटेशन्स दाखवली. दोघंपण अतिशय खुष दिसले. हा फॉरमॅट आवडला. त्या विषयी थोडी चर्चा व आखणी झाली. चहा पोहे झाले. आठच्या सुमारास ते गेले. मी व विक्रम खाली चक्कर मारून आलो. तो व्यायाम शाळेत तर मी परिसरात फिरून आलो.

**२३ मे २०११ . सोमवार**
खाल रात्री खूपच उशीरापर्यंत वायफळ गप्पा मारत बसल्यानं सगळेच उशीरानं उठलो . विनीतला कामावर जायला पार दहा वाजून गेले . विक्रम उठून त्याचा अभ्यास व जायची तयारी करू लागला . ऋचा व प्रेरणा स्वयंपाकाच्या मागं लागल्या . आज खास विक्रमसाठी ऋचानं केक बनवला व पाणी पुरीचा बेत केला . जेवून तासभर ताणून दिली . दुपारी रॉब मिलीस चा फोन आला . तो आता परत आला आहे . बुधवारी दुपारी न्यायला येणार आहे . दोनेक वर्षांपूर्वी रेकॉर्ड सच्या निमित्तानं तो मुंबईला येऊन गेला होता .



सायंकाळी पाच वाजता ऋचा व प्रेरणा विक्रमला एअरपोर्टवर सोडायला गेल्या . बाहेर कडक उन पडलं असल्यानं मी पण फिरायला बाहेर पडलो . घरामागच्या टेकडीवरून वळणदार वाटांवरून खाली उतरलो . छानच रपेट झाली . परत येत असताना वाटेत ऋचा व प्रेरणा भेटल्या . गाडीतून ब्ल्यू बेरी पार्क पहायला गेलो . मोठी शेती आहे . तळयाकाठी फेरी मारून आलो . पण खूप गार होतं . त्यामुळं लवकरच परत आलो . पाणी पुरी व केक आइस्क्रीमचा बेत होता . मस्त जेवून लवकरच झोपलो .

**२४ मे २०११ . मंगळवार**
आज ढगाळच वातावरण होतं . पण अधून मधून खूप मस्त उन पण पडत होतं . थोडा वेळ बाहेर जाऊन वरच्या बागेत जाऊन उन्हात बाकडयावर बसलो . प्रेरणा व ऋचा व्यायामशाळेत जिममध्ये जाऊन आल्या . जेवून दुपारी जरा आराम केला . सायंकाळी विनीतला आणायला त्याच्या ऑफिसमध्ये गाडीनं गेलो . मग चौघे होंडा मोटरसायकलच्या शो रूम मध्ये गेलो . त्यांना हवं असलेलं सामान पहायला ते दोघे आत गेले .




तर आम्ही दोघं बाहेर तरूणांच्या बाईकवरच्या कसरती चालल्या होत्या तिथं बघत बसलो . तिथून फर्निचरच्या एका प्रचंड शो रूम पाशी गेलो . अफाट व अवाढव्यच काम आहे अगदी . मग वॉलमार्ट मध्ये जाऊन आलो . मी व ऋचा आत जाऊन वाण सामान घेऊन आलो . डाळ, तांदूळ, तेल साखर संपत आलेलं होतं . घरी नऊ वाजता येऊन जेवलो . विनीतची तब्येत जराशी नरम असल्यानं तो लवकर झोपला . प्रेरणा पण लवकर झोपी गेली . मी जरावेळ लिहीत व वाचत बसलो . मग उशीरानं झोपलो . उद्या रॉब मिलीस यावयाचा आहे . दोनेक वर्षांपूर्वी भारतात आला होता . त्यावेळी दोनदा मुंबईत घरी येऊन गेला होता . त्याच्या एका रिसर्च ग्रांट करिता मी रेकमेंडेशन पण दिलं होतं .

**२५ मे २०११ . बुधवार**

आज इथं येऊन तीन आठवडे होतील . अजून पाच आठवडे जायचे आहेत . पण काही ना काही कामात असल्यानं तसा कंटाळा मात्र आलेला नाही . सकाळची नेहमीची कामं झाली . नेटवरील मेलभेटी व नेटवरचं पेपर वाचन झालं . पावसाची चिन्हं असल्यानं मग सकाळी कुठेही फिरायला गेलो नाही . प्रेरणा व ऋचा मात्र जिम मध्ये जाऊन व्यायाम करून आल्या . थालीपीठं बनवली होती . थोडं खाऊन घेतलं . दीड वाजता रॉब आल्यावर त्याच्याबरोबर निघालो . वीसेक मैलांवरती ग्रीनवुडमध्ये त्याचं घर आहे . अर्ध्या तासाच्या ड्राइव्हनंतर तिथं पोहोचलो . आता बरेचसे रस्ते व वाटेवरची ठिकाणं नेहमीच जात असल्यानं परिचयाची होत आहेत . रॉब हा इथं पंधरा वर्ष रहात असल्यानं त्याच्या समोरच गगनचुंबी इमारती उभ्या राहिलेल्या आहेत . त्यांची माहिती सांगत होता . माणूस अगदी मोकळा ढाकळा असल्यानं खूप गप्पा अखंडपणे चालूच होत्या . ओबामा, त्याच्या कडून लोकांच्या अपेक्षा, तेल केंद्रस्थानी ठेवून चाललेलं आंतरराष्ट्रीय राजकारण, भारत व पाकिस्तान यांच्यातले राजकीय ताणतणाव व सामान्य नागरिकांच्या भूमिका, इथली बेकारी व बेरोजगारी, त्याच्या व बायकोच्या व्यवसायातल्या अडचणी व समस्या असे अनेक विषय बोलून झाले .



त्याचं घर म्हणजे छोटीशी बंगलीच आहे . वरच्या मजल्यावर हयाचं साम्राज्य तर खाली बेसमेंटमध्ये बायकोचं . हा कलाकार . गिटार वादक व संगीत संयोजक . रेकॉर्ड कलेक्टर व अभ्यासक . सुमारे पंचेचाळीस वर्षांचा . वरच्या मजल्यावरचा हॉल व एक खोली हयाच्या सामानानं गच्च भरलेली तर तळघरात बायकोची पुस्तकं व गोधडया शिवायच्या चिंध्यांनी एक भिंत भरलेली . ती पुस्तकं विकते . शिवणकामात पण चांगली गती आहे . सध्या न्यूयॉर्कला कामानिमित्तानं गेलेली आहे . दोन्ही मजल्यांवरती दाटीवाटीनं पण कलात्मकतेनं खूप गोष्टी व सामान भिंतींवरती, पॅसेजमध्ये लावलेलं . गरमागरम काळा चहा, पिस्ते व सुक्या अंजिराचा आस्वाद घेत गप्पा मारत व गाणी ऐकत बसलो .



अमेरिकन जाझ, कंट्री, चर्च, गोस्पेल व लोकसंगीताचे असंख्य नमुने १९२० ते ६० हया काळात मुद्रित झालेले ऐकायला मिळाले . त्याबरोबर गप्पा पण चालू होत्याच . अमेरिकन रेकॉर्डसचा व ध्वनिमुद्रणांचा इतिहास, व्यक्तिगत व संस्थात्मक संग्रह, साठवण व पुनर्वितरण असे अनेक विषय बोलून झाले . जुन्या कॅबिनेट पासून ते जपानी मेकच्या घडीच्या

फोनोपर्यंत मशीन्स त्यानं आपणहून काढून दाखवली. अगदी आपलेपणानं. मला तर सनी मॅथ्यूच्याच घरी जाऊन आल्यासारखं वाटत होतं. त्यानं संगीत दिलेल्या पण काही रचना ऐकल्या. त्याच्या डस्ट टू डिजिटल प्रकल्पातली पण काही कामं बघितली. साडेपाचच्या सुमारास मग तो मला पुन्हा सोडायला आला. गाडीत पुन्हा गप्पा चालूच होत्या.



त्याची बायको टेक्सासची. आई फिलीपनी तर वडील अमेरिकन. अलिकडच्या घरांच्या घोटाळयात नुकसान झाल्यानं आता ओरेगॉन मध्ये स्थायिक. हयाचे दोघे मोठे भाऊ निराळया क्षेत्रात. मोठा भाऊ सुपरकंडक्टरवर विद्यापीठात काम करतो व शिकवतो. आत्ता एका परिषदेकरिता भारतात जायचा आहे म्हणाला. डाऊनटाऊन मधून जात असताना ट्रॅफिक जॅम मध्ये अडकल्यानं भरपूर बोलायला मिळालं. २००१ च्या इथल्या व सॅन फ्रॅनसिस्को इथल्या भूकंपाविषयी व झळ पोहोचून खचलेल्या पुलांविषयी बरीच माहिती दिलीन. प्रवासात असतानाच न्यू जर्सीहून अशोक देशपांडे हयांचा फोन आला. रेडियोवरील मुलाखतीकरिता. घरी गेल्यावर बोलू म्हणालो. घराच्या वाटेवर असतानाच पावसाला सुरूवात झाली. घरी पोहोचेतो अगदी मुसळधारच पडायला लागला. पुष्कळ दिवसात असा कोसळलेला बघितला नव्हता म्हणाला. सगळे घरीच होते. त्यामुळे त्याला पण आत बोलावलं. विनीतची ओळख करून दिली. खास इंडियन चहा, बिस्किटं व चकलीचा मनापासून आस्वाद घेत व विविध विषयांवर बोलत बसला. मायक्रोसॉफ्ट मधल्या इमारतींमध्ये व कँटीन वगैरे परिसरात सजावट (इन्स्टॉलेशन्स) माझ्याच गुपनं केली आहे म्हणाला. बायको परतल्यावर पुन्हा एकमेकांकडं भेटायचं ठरलं. पाऊस पण कमी झाला होता. तो गेल्यावर मग देशपांडेंना फोन केला. खरंतर दमलो होतो. पण देशपांडेंशी बोललो. त्यांनी दूरच्या सहरातल्या सहकारी विद्या हयांच्याशी कॉन्फरन्स कॉल लावला. हया शनिवारी रेडियोवर मुलाखत व काही गाणी ऐकवायचं ठरलं. उद्या दुपारी फोनवरून मुलाखत ध्वनिमुद्रित करावी असं ठरलं. जेवून मग देशपांडे हयांना काही गाणी पाठवून दिली. दमलो असल्यानं पडताच झोपी गेलो.

**२६ मे २०११. गुरूवार**

हया आठवडयात हवामान सकाळी कडक उन व दुपारी ढगाळ आणी पावसाचं होतं. पण छान उन पडल्यानं सकाळी दहा ते बारा दोघं खाली पार्कमध्ये फिरून आलो. गार वारं होतं खरं पण मधूनच स्वच्छ उनपण पडत असे.



दुपारी थोडं वाचन व विश्रांती झाली. प्रेरणा व ऋचा बाजारहाट करायला गेल्या. तर मी देशपांडेंच्या फोनची वाट पहात बसलो. सहा वाजता त्यांचा फोन आला. शनिवारच्या कार्यक्रमासाठी दोनेक तास आहेत. पैकी सुमारे एक तास मुलाखत व एक तास गाणी ऐकवावी असं त्यांनी योजलं आहे. देशपांडे न्यू जर्सीत तर त्यांच्या सहकारी वर्षाताई आणखी दूरच्या शहरात. मी इकडे पस्चिम किना-याला. पण ऑडियो कॉन्फरन्सिंगमुळे अगदी छान सुसंवाद साधता आला. सुमारे पन्नास मिनिटं बोललो. शेवटी मी अगदी दमून गेलो. मध्येच विनीत आला. पण मुलाखत चालू असल्यानं अगदी आवाज न करता घरात वावरला. थोडया वेळानं त्या दोघी आल्या. जेवून गाडीतून खूप लांबवर फेरफटका मारून आलो. आसपासच्या ग्रामीण परिसरात वीसेक मैलांची चक्कर मारून आलो. ऊशीरा झोपलो. हया शनिवारी गंगोली हयांच्या कडे माझा कार्यक्रम ठेवला आहे. मोहीत चिटणीसनं फार भारावून जाऊन आपल्या मेलवरून मित्रांना माझ्याविषयी कळवलं आहे तर सॅन होजेच्या मुकुंद मराठे हयांनी १५ जूनच्या कार्यक्रमाचं योजत असल्याचं कळवलंय. सायंकाळी धनंजय गोखलेचा फोन आला. त्याच्याकडे पण बरीच दुर्मिळ गाणी टेपवरती आहेत म्हणाला. तीस वर्षानंतर भारततले विद्यापीठातले एकेक मित्र आता इथे भेटताहेत.

**२७ मे २०११. शुक्रवार**

आज कडक उन पडलं असतानाच दोघं फिरायला बाहेर पडलो. खाली लेकमॉंट पार्कमध्ये दोघं चकरा मारत बसलो. दोनेक चकरा झाल्या तोच पावसाची जोरदार सर आली. अगदी भिजूनच जाणार होतो. पण एका शेडपाशीच असल्यानं पटकन आत गेलो. तिथं एक भारतीय जोडपं पण येऊन बसलेलं होतं. आधी पण काही वेळा दोघांना इथं फिरताना बघितलं होतंच. पण बोलायचा योग आज होता. त्या बाईनीच बोलायला सुरूवात केली. पटटाभी आडनाव. चेन्नईला राहतात. नवरा इंजिनियर. इथं मुलीकडं वर्षभर आहेत. आता परत जायच्या आहेत. हया मुंबईत बराच काळ असल्यानं हिंदी छान बोलत होत्या. टी. आय. एफ. आर. ला पण कम्प्युटरच्या कामानिमित्तानं अनेकदा येऊन गेल्या असल्यानं तिथल्या खूप गप्पा व चवकश्या झाल्या. ऋचाचा फोन आला. गाडी घेऊन येऊ का म्हणून. पण थोडं थांबून कळवितो म्हणालो. समोर खरोखरीच आभाळ मोकळं होत होतं. ही गप्पा मारणारी मंडळी पाऊस थोडा कमी झाल्यावरती गेली. मग दहा मिनिटांतच उन पडल्यानं ऋचाला कळवून दोघं हळूहळू चालतच घरी आलो. काही वेळापूर्वी इथं जोराचा पाऊस पडून गेला हे कुणाला खरं सुद्धा वाटलं नसतं. दुपारी थोडी विश्रांती घेऊन मग नेटवर काम करत बसलो. साडेसात वाजता जेवणं आटोपल्यावर गाडीनं फिरायला गेलो.



घराकडं येताना हाय वे वरती एक सायकल व पायी चालणा-यांसाठी पूल दिसतो. तो सगळया बाजूंनी गोलाकार जाळया व सळयांनी बंद असल्यानं आतून पहायची उत्सुकता होती. तिथं अलिकडं गाडी थांबवून मग पुलावर जाऊन आलो. गार वारं असल्यानं मग फार काही फिरायला मिळालं नाही. पण गाडीतून लांब चक्कर मारून आलो. उद्याच्या गंगौलींकडच्या कार्यक्रमाची तयारी करत बसलो. पूर्वसूरींचे सूर च्या हिंदी आवृत्तीचं बरंच काम करायचं बाकी आहे असं वेळेवरच लक्षात आल्यानं उद्या उठून प्रथम ते करायचं ठरवलं.

## २८ मे २०११ शनिवार

नेहमीप्रमाणे लवकर उठून आजच्या कार्यक्रमाचं डागडुजीचं काम करत बसलो. दोनेक तास गेले. पण एकदाचं फायनल झालं. शनिवार असल्यानं आरामच होता. विनीत त्याच्या मोटरसायकलच्या कामांसाठी जाऊन आला तर हया दोघी जणी बागेत फिरून आल्या. १२ ते २.३० पर्यंत रेडियो दिल वरून माझी मुलाखत व गाणी ऐकविली जात होती. ती ऐकत बसलो. जेवून जरावेळ झोप काढली. फारशी लागली नाहीच. साडेपाच वाजता निघालो. सहा वाजता मला गंगौलींच्या घरापाशी सोडून तिघं गेले. ते आठ वाजता परत घ्यायला आले.



देबाशिशनं प्रोजेक्टर वगैरे आणून ठेवला होता. साडेसहा वाजता 'पूर्वसूरींचे सूर' कार्यक्रम सुरू केला. दहा जणं होतो. रॉब मिलीस त्याच्या एका मैत्रिणीला घेऊन आला होता. टीआयएफआर मधला नगेशा त्याच्या छोटया मुलीला घेऊन आला होता. नारायण सरदेसाई बायकोला घेऊन आले होते. त्यांची व माझी नेटवरच भेट. आज प्रत्यक्ष भेटीचा योग आला. माहिती देत घेत निम्मा कार्यक्रम ऐकवला. उरलेला जून च्या शेवटच्या आठवडयात करायचं ठरवलं. मग शेवयांचा उपमा खाल्ला. तोवर मला घ्यायला ऋचा आलीच. घरी येईतो दहा वाजलेच. जेवून लवकरच झोपलो. उद्या लवकर उठायचं आहे.

## २९ मे २०११ रविवार

आज ऑलिंपिक नॅशनल पार्कमध्ये जायचं ठरलं होतं. त्याची तयारी पण झाली होती. मी व प्रेरणा नेहमीप्रमाणे पहाटे लवकरच उठून बसलो. काल खरंतर छान व शांत अशी झोप लागलीच नाही. पण साडेसहा वाजता सगळे आवरून निघालो. विनीत व ऋचा पण लवकर उठले. इतक्या पहाटे रहदारी पण फारशी नव्हती. डाऊन टाऊन च्या वाटेवरच दूरवर क्षितीजावर दिशा उजळल्या होत्या. अगदी स्वच्छ वातावरण असल्यानं शुभ्र हिमशिखरांच्या पर्वत रांगा फार स्पष्टपणे दिसत होत्या. सिॲटलच्या आभाळात मात्र काळे ढग भरून आलेले होते.



आमची आजची सहल छान होणार अशी चिन्हं दिसू लागलेली होती. पंचवीसेक मैलावरती बोटीच्या फेरीकरता तिथल्या धक्यावरती वीसेक मिनिटं अगोदरच जाऊन ऊभे राहिलो. अजस्त्र बोटीवरच्या दोन मजल्यांवर मिळून दोनेकशे मोटारी व पॅसेंजर वाहून नेण्याची सोय आहे.



अर्धा तास प्रवास करून पलिकडच्या तीरावरती आलो. हा संथ पाण्यातला प्रवास फार छान व गोवा व केरळातल्या प्रवासाची आठवण करून देणारा आहे. वर डेक वर अतिशय छान व सर्व सोयींचं असं विश्रामस्थान आहे. तिथं जाऊन कॉफी घेऊन बसलो. बाहेर मोकळया हवेवर फिरून पण आलो. दूरवर सुंदर पर्वत रांग दिसत होती.



पलिकडच्या तीरावरती पोचल्यावरती पुन्हा दीडेक तास गाडी चालविल्यावरती ऑलिंपिक नॅशनल पार्कच्या परिसरात पोहोचलो. गाडीनं अगदी वर डोंगरमाथ्यावर जाऊन पोहोचलो. ऋचा मोटर अगदी सफाईदार चालविते. सहा हजार फुटांवर आलो होतो. आजूबाजूला छान बर्फ जमा झालं होतं. तिथं लहान मोठी मंडळी अगदी मजेत खेळत होती. फोटो वगैरे काढून घेत होती. अगदी उत्तराखंड हिमालयातल्या पर्वतराजींची आठवण होत होती. एकमेव अश्या टूरिस्ट



सेंटरच्या मोठया लाकडी इमारतीत छान प्रदर्शन मांडलंय ते बघितलं. तिथंच एका छोटया सिनेमा गृहात वीसेक मिनिटांची फिल्म दाखवत होते. ती बघितली. पुण्यास आमच्या घरापाशीच राहणारे कुलकर्णी नावाचे कुटुंब भेटलं. ते अप्पांना व मुलांना ‘अष्टविनायक सहल’वाले म्हणून ओळखतात. त्यांच्याशी थोडा वेळ गप्पा झाल्या.



एक वाजता तिथून निघालो. तोवर सुटी असल्यानं खूप मंडळी गाडया घेऊन आलेली होती. मग येताना सर्व वेळ विनीतनंच गाडी चालविली. भराभर पहाड उतरून खाली आलो. हया राष्ट्रीय उद्यानाचा पसारा अफाट आहे. तिथल्या एका विस्तीर्ण तळयाच्या काठानं बराच वेळ फिरलो. एके ठिकाणी छान जागा पाहून वन भोजन केलं. बरोबर नेलेले पदार्थ खाल्ले. आज दिवस भरात पावसानं दडीच मारल्यानं खूप मजा आली.



मग पुढे एका गरम पाण्याच्या झ-यापाशी गेलो. वाटेत जंगलातल्या दोन कँपिंग साईटस बघितल्या. बरीच मंडळी तंबू ठोकून सुटीतल्या वनविहाराचा आनड घेत होती. एका हॉटेलच्या मागच्या बाजूला दोन मोठया कुंडांमध्ये सल्फरयुक्त नैसर्गिक गरम पाणी दोन कुंडांत वाहतं ठेवलेलं होतं. औषधी असल्यानं तिथं बरीच मंडळी डुंबत होती.



तिथं थोडा वेळ थांबून पुढं एक धवधबा बघायला गेलो. मी कारपार्क पाशीच थांबलो. तिघंजण दोन मैल चालून पाहून आले. मग दोनेक तास प्रवास करून बोटीच्या धक्यावर आलो. आता बरीच गर्दी झालेली होती. आठ वाजता आमचा नंबर लागला. घरी येईतो साडेनऊ वाजले. दूध पाव खाऊन झोपून गेलो.

**३० मे २०११ सोमवार**

आज विनीतला सुटी होती. पण तो घरातनं काम करणार होता. आम्ही दोघं रोजच्या वेळेला तर ती दोघं खूप उशीरानं उठली. नेटवर काम करत व लिहित बसलो ते पार बारा वाजेपर्यंत. भानच राहिलं नाही. बाहेर आभाळ आलं होतं व गार पण पुष्कळ होतं. त्यामुळं फिरायला जायचा पण काहीच प्रश्ण नव्हता. जेवून थोडा झोपलो. कालच्या प्रवासानं नाही म्हटलं तरी बराचसा शीण आलेला होता. संध्याकाळी पुन्हा वाचत व लिहित बसलो. आज दिवसभरात घरीच बसून असल्यानं कंटाळा आला होता. मग स्वयंपाक आटोपून दोघी तयार झाल्यावर तिघं गाडीनं जवळच्याच एका बागेत जाऊन आलो. तशी खूप मोठीच होती. मुलांना खेळण्याकरिता खूप मोठाली मैदानं होती.



तासभर फिरून साडेआठ वाजता घरी आलो. जेवून गप्पा मारत बसलो. संविदशी फोनवरून बोललो. तिचा दहावीचा निकाल लागला. ९५ च्या पुढं गुण मिळाले असून खुष आहे. विक्रमचा उद्या इंटरव्हयू असल्यानं तो अभ्यास करतोय. फेसबुक वर त्याच्याशी थोडावेळ गप्पा मारल्या. दुपारी पण थोडी झोप झालेली असल्यानं रात्री झोपायला ऊशीरच झाला.

**३१ मे २०११ मंगळवार**

पाऊसच पडण्याची लक्षणं होती. अगदी हलकीशी भूरभूर असतानाच खाली बागेपर्यंत एक चक्कर मारून आलो. तोच एक मोठी सर येऊन गेली. दोघी जिममध्ये जाऊन आल्या. जेवून जरा आराम केला. संध्याकाळी विनीत आल्यावरती गाडीतून एक चक्कर मारून आलो. विक्रमचा फोन आला होता. इंटरव्हयू छान झाला म्हणाला. जेवून मग विनीतकडून मोबाईल फोन व चेकसम सॉफ्टवेअरची माहिती करून घेतली. बराच वेळ काम करत बसलो. इथल्या मराठी मंडळींत मी आल्याची व माझ्या प्रेझेंटेश्न्सची माहिती माऊथ पब्लिसिटीतून पोहोचते आहे.

डॉ. सुरेश चांदवणकर, नेव्हीनगर, कुलाबा मुंबई
०४ मे २०११ ते ४ जुलै २०११
chandvankar.suresh@gmail.com